विद्युत दरात देण्यात येणाऱ्या सवलतीपोटी
निधी उपलब्ध करुन देण्याबाबत सन २०२१-२२
मे.लोटस इंडस्ट्रीज, सांताक्रुझ, मुंबई.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. टॅरिफ-२०२०/प्र.क्र.७९/ऊर्जा-३,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १७ नोव्हेंबर, २०२१.

**संदर्भ**:-१. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.टेरीफ- २००८/प्र.क्र.१४/ऊर्जा-३, दि. २६/०२/२००८.
२. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.टेरीफ-२००८/प्र.क्र.१४१/ऊर्जा-३, दि. ३१/०१/२००९.
३. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.टेरीफ-२००८/प्र.क्र.२६/ऊर्जा-३, दि. १३/०६/२०१९.
४. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३,दि.२४/०६/२०२१.
५. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.बीयुडी-२०२१/प्र.क्र.४८/ऊर्जा-३, दि.२४/०६/२०२१
६. शासन निर्णय, ऊद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.टॅरीफ-२०२०/प्र.क.७९/ऊर्जा-३, दिनांक २९ जूलै, २०२१
७. मुख्य विद्युत निरिक्षक, मुंबई यांचे पत्र क्र. मुविनि/१४७९/२०२१, दि.२१/१०/२०२१.चेपत्र.
८. शासन निर्णय, ऊद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.बीयुडी-२०२१/प्र.क.५१/ऊर्जा-३, दिनांक १६ नोव्हेंबर, २०२१

**प्रस्तावना :-**

शासनाच्या प्रचलित धोरणानुसार राज्यातील यंत्रमागधारकांना शासनामार्फत वीजेच्या दरात सवलत देण्यात येते. या सवलतीपोटी देय असलेली रक्कम संबधित अनुज्ञप्ती धारकांमार्फत यंत्रमाग धारकांना परत केली जाते. शासनाच्या सदर धोरणानुसार मे. अदानी इलेक्ट्रीसिटी लि. मुंबई या कंपनीच्या कार्यकक्षेत कार्यरत असलेल्या मे.लोटस इंडस्ट्रीज, सांताक्रुझ, मुंबई. यांना अनुक्रमे दिनांक ०१/०४/२०२० ते ३१/०३/२०२१ या कालावधीत विद्युत दरात दिलेली सवलतीची रक्कम रु. ६,९०,०१६/- (रू. सहा लक्ष नव्वद हजार सोळ रुपये फ़क्त) परत देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

मे. अदानी इलेक्ट्रीसिटी कंपनी लिमिटेड, मुंबई यांचे वीज ग्राहक असलेले मे.लोटस इंडस्ट्रीज, सांताक्रुझ, मुंबई या यंत्रमागधारक ग्राहकास (ग्राहक क्र. १०२६९७२९५) माहे दिनांक ०१/०४/२०२० ते ३१/०३/२०२१ या कालावधीत विद्युत दरात दिलेली सवलतीची एकूण रक्कम रु. ६,९०,०१६/- (रू. सहा लक्ष नव्वद हजार सोळ रुपये फ़क्त) मे. अदानी इलेक्ट्रीसिटी लि., मुंबई या कंपनीमार्फत यंत्रमागधारकाला परतावा करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत असून सदर रक्कम या आदेशान्वये उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या अर्थसहाय्याची रक्कम ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आलेली आहे, त्याच कारणासाठी उपयोगात आणली जाईल याची दक्षता घ्यावी.

३. सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील खर्चासाठी, "मागणी क्र. के-६, २८०१ वीज, ०५ पारेषण व वितरण, ८०० इतर खर्च, (०१)(०२) यंत्रमाग विषयक प्रशुल्क कमी करण्यासाठी वीज वितरण/पारेषण लायसन्सधारकांना अर्थसहाय्य (कार्यक्रम) (२८०१५५८१) ३३ अर्थसहाय्य" या लेखाशीर्षाखाली करण्यात येते .सन २०२१-२०२२ आर्थिक वर्षासाठी सदर लेखाशीर्षाखाली एकूण रक्कम रु.६००/- कोटीची अर्थसंकल्पीय तरतुद करण्यात आलेली आहे . वित्त विभागाच्या संदर्भिय शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३ दिनांक २४ जुन,२०२१ च्या परिपत्रकाच्या अनुषंगाने अर्थसंकल्पिय तरतुदीच्या ६०% च्या मर्यादेत निधी वितरणासाठी उपलब्ध आहे.तथापि,वित्त विभागाच्या अनुमतीने दिनांक २९/०६/२०२१ च्या शासन निर्णयान्वये महावितरण कंपनीला रुपये २३५.०० कोटी सवलत रोखीने वितरित करण्यात आली आहे व दि. १६.११.२०२१ रोजी रु. ३६५.०० कोटीचे आदेश निर्गमित करण्यात आले आहेत.

४. या लेखाशिर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. तसेच उपयोगिता प्रमाणपत्र प्रलंबित नाही.

५. सदर रक्कम अधिदान व लेखा अधिकारी मुंबई यांचेकडून आहरित करुन, ती रक्कम मे. अदानी इलेक्ट्रीसिटी लि. मुंबई यांचे मार्फत मे.लोटस इंडस्ट्रीज, सांताक्रुझ, मुंबई, यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री.ना.रा.ढाणे, अवर सचिव आणि नियंत्रण अधिकारी म्हणून श्री. उ. द. वाळुंज, सह सचिव यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यांनी रक्कम रु. ६,९०,०१६/- (रू. सहा लक्ष नव्वद हजार सोळ रुपये फ़क्त) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून आहरित करुन **मे. अदानी इलेक्ट्रीसिटी लि. मुंबई** यांचे नावे स्वतंत्ररीत्या आरटीजीएस द्वारे वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

६. महाराष्ट्र विनियोजन (लेखा अनुदान) विधेयक-२०२१,परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/ प्र.क्र.४८/ अर्थ-३, दि.२४/०६/२०२१च्या परिपत्रकातील अनुक्रमांक ६ या अटीची पूर्तता होत आहे. तसेच परिच्छेद क्र.७ ते १७ मधील अटीं लागू होत नसल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

७. या लेखाशीर्षाखाली निधी वितरीत करण्यासाठी सादर करण्यात आलेल्या देयकाच्या अनुषंगाने प्रमाणित करण्यात येते की, या लेखाशीर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही तसेच उपयोगिता प्रमाणपत्र प्रलंबित नाही. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. २५२/२०२१/व्यय-१६, दिनांक ११.११.२०२१ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२१११७१५५९४००२१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NANASAHEB RAJARAM DHANE

Digitally signed by NANASAHEB RAJARAM DHANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a71698611123263cde9d32423e9bb73044d91ed0cffad3b6267198ee5014159f, pseudonym=5DD23ACB82750B55FAC0D076A47198885E07A4B6, serialNumber=6C39E2858150DBDFCFE6CD25ED08ADF59F4D2FD8C1EDE1730735F604904BF3BB, cn=NANASAHEB RAJARAM DHANE
Date: 2021.11.17 16:03:08 +05'30'

**(ना. रा. ढाणे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१. व्यवस्थापकीय संचालक, मे. अदानी इलेक्ट्रीसिटी लि. मुंबई देविदास लेन, एसव्हीपी रोडच्या बाजुला देविदास टेलिफोन एक्सचेंज,बोरीवली (पश्चिम), मुंबई ४००१०३.
२. मे.लोटस इंडस्ट्रीज, व्हिला, वेस्ट ॲव्हेन्यू रोड विजय बँक फॅारेन एक्सचेंज डिपार्टमेंट,सांताक्रुझ (पश्चिम), मुंबई- ४०००५४
३. मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, सार्वजनिक बांधकाम प्रशासकीय इमारत, ३ रा मजला, रामकृष्ण चेंबूरकर मार्ग, चेंबुर (पूर्व), मुंबई-४०००७१.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०
५. महालेखापाल (लेखा व परिक्षा),महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
७. अधिदान व लेखा अधिकारी (अराप/रालेवि-१), मुंबई.
८. अधिदान व लेखा अधिकारी,अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
९. अवर सचिव (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१०. कक्ष अधिकारी (प्रशासन-१),उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
११. वित्त विभाग/(अर्थसंकल्प-३/साधनसंपत्ती/साऊ/व्यय-१६), मंत्रालय, मुंबई- ४०००३२.
१२. ऊर्जा-३ कार्यासन संग्रहार्थ.